**तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या सामायिक प्रवेश संदर्भातील प्रक्रीया व सक्षम प्राधिकारी घोषित करण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

शासन निर्णय क्र.टीईएम - २०१५/१२१०/प्र.क्र.४३९/तांशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.
दिनांक: २४ सप्टेंबर, २०१५

## प्रस्तावना :

महाराष्ट्र विनाअनुदानित खाजगी व्यावसायिक शैक्षणिक संस्था (प्रवेश व शुल्क यांचे विनियमन) अधिनियम, २०१५ मधील कलम २(द) अनुसार शासनाने व्यावसायिक शिक्षणांतर्गत विभागाच्या अखत्यारित येणारे अभ्यासक्रम हे दिनांक १६ /०६/२०१५ च्या अधिसूचनेव्दारे घोषित केले आहेत.

२. सदर अधिनियमातील कलम ४(क) मधील तरतुदीनुसार कलम ४(क) व कलम १०(७) अन्वये सर्व व्यावसायिक अभ्यासक्रमाचे प्रवेश हे राज्य सामायिक प्रवेश परीक्षा व केंद्रीभूत प्रवेश प्रक्रीयेच्या माध्यमातून करणे अपेक्षित आहे. तथापि, कलम ४(क) मधील दुस-या परंतुकान्वये ज्या व्यावसायिक अभ्यासक्रमांना राज्य सामायिक प्रवेश परीक्षेमधून सूट द्यावयाची आहे त्याबाबत शासन मान्यतेने स्वतंत्र आदेश काढणे अपेक्षित आहे.

३. या अनुषंगाने ज्या व्यावसायिक अभ्यासक्रमांना उपरोक्त तरतूदीच्या आधारे राज्य सामायिक प्रवेश परीक्षा देण्यास सूट देणे आवश्यक आहे, अशा अभ्यासक्रमांसदर्भात स्वतंत्र आदेशान्वये सूट देण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :

तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अखत्यारितील ज्या व्यावसायिक अभ्यासक्रमांना राज्य सामायिक प्रवेश परीक्षा आणि केंद्रीभूत प्रवेश प्रक्रिया लागू राहणार आहे व ज्यांची संपूर्ण प्रवेश प्रक्रिया आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा यांचेमार्फत राबविली जाणार आहे, त्या अभ्यासक्रमांचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | अभ्यासक्रमाचे नांव | सामायिक प्रवेश परीक्षेचा स्तर व सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|
| **अ** | **पदवी अभ्यासक्रम** | |
| १. | प्रथम वर्ष अभियांत्रिकी | राज्य सामायिक प्रवेश परीक्षा |
| २. | प्रथम वर्ष औषधनिर्माणशास्त्र | राज्य सामायिक प्रवेश परीक्षा |
| ३. | प्रथम वर्ष हॉटेल मॅनेजमेंट अँड कॅटरींग टेक्नॉलॉजी | राज्य सामायिक प्रवेश परीक्षा |
| **ब** | **पदव्युत्तर पदविका** | |
| १. | पीजीडीएम/पीजीडीबीएम | राज्य सामायिक प्रवेश परीक्षा |

| क | पदव्युत्तर पदवी | |
|---|---|---|
| १. | वास्तुशास्त्र (एम आर्च) | राज्य सामायिक प्रवेश परीक्षा |
| २. | एमबीए/एमएमएस | राज्य सामायिक प्रवेश परीक्षा |
| ३. | प्रथम वर्ष व व्दितीय वर्ष एमसीए | राज्य सामायिक प्रवेश परीक्षा |
| ४. | प्रथम वर्ष हॉटेल मॅनेजमेंट अँड कॅटरींग टेक्नॉलॉजी, | राज्य सामायिक प्रवेश परीक्षा |
| ५. | फार्म डी | राज्य सामायिक प्रवेश परीक्षा |

२. तथापि, ज्या पदवी/पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाची समायिक प्रवेश परीक्षा ही अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, काऊन्सिल ऑफ आर्किटेक्चर इ सारख्या समुचित प्राधिकरण अथवा केंद्र शासनाच्या अखत्यारितील सक्षम प्राधिका-यांमार्फत घेण्यात येतात व त्या परीक्षेतील गुणांच्या आधारे राज्याच्या केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेच्या माध्यमातून राज्यातील संबंधित महाविद्यालयांमध्ये प्रवेश देण्यात येणार आहे, अशा व्यावसायिक अभ्यासक्रमांचा तपशिल खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र | अभ्यासक्रमाचे नांव | सामायिक प्रवेश परीक्षेचा स्तर व सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|
| **अ** | **पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम** | |
| १ | प्रथम वर्ष वास्तुशास्त्र | वास्तूकला परिषदेमार्फत (COA) आयोजित NATA ची प्रवेश परीक्षा |
| **ब** | **पदव्युत्तर पदवी** | |
| १ | अभियांत्रिकी (एम.ई./एम.टेक.) | आय.आय.टी. मार्फत आयोजित GPAT परीक्षा |
| ३ | औषधनिर्माणशास्त्र (एम फार्म) | अखिल भारतीरय तंत्र शिक्षण परिषदेमार्फत (AICTE) आयोजित GATE परीक्षा |

३. तसेच ज्या व्यावसायिक अभ्यासक्रमांना राज्य सामायिक प्रवेश परीक्षा लागू राहणार नाही, परंतु केंद्रीभूत प्रवेश प्रक्रीयेच्या माध्यमातून प्रवेश प्रक्रियेव्दारे प्रवेश करणे आवश्यक आहे, अशा व्यावसायिक अभ्यासक्रमांबाबतचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | अभ्यासक्रमाचे नांव | सामायिक प्रवेश परीक्षेबाबत अभिप्राय |
|---|---|---|
| **अ** | **पदविका (पोस्ट एच.एस.सी.)** | |
| १ | अभियांत्रिकी | सामायिक प्रवेश परीक्षा नाही |
| २ | औषधनिर्माणशास्त्र | सामायिक प्रवेश परीक्षा नाही |
| ३ | हॉटेल मॅनेजमेंट अँड कॅटरींग टेक्नॉलॉजी | सामायिक प्रवेश परीक्षा नाही |

| | | |
|---|---|---|
| **ब** | **पदविका (पोस्ट एस.एस.सी.)** | |
| १ | अभियांत्रिकी | सामायिक प्रवेश परीक्षा नाही |
| **क** | **थेट व्दितीय वर्ष (पोस्ट एस.एस.सी.)** | |
| १ | अभियांत्रिकी पदविका | सामायिक प्रवेश परीक्षा नाही |
| **ड** | **थेट व्दितीय वर्ष पदवी** | |
| १ | अभियांत्रिकी | प्रवेश परीक्षा नाही |
| २ | औषधनिर्माणशास्त्र | प्रवेश परीक्षा नाही |

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०९२४११०४११६८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Madan Maruti Morve

Digitally signed by Madan Maruti Morve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madan Maruti Morve
Date: 2015.09.24 17:04:18 +05'30'

**(म. मा. मोरवे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा तथा सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, बांद्रा (पूर्व), मुंबई
२. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. सर्व सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय
४. अप्पर मुख्य सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
५. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन,महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, बांद्रा (पूर्व), मुंबई
७. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव
८. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव
९. निवड नस्ती/तांशि-४